नागपूर मेट्रो रेल्वे प्रकल्पामधील राज्यशासनाचे दुय्यम कर्ज सहाय्य महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन यांना वितरित करण्याबाबत. (सन २०२१-२२)

# महाराष्ट्र शासन

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एमआरडी-३३२१/प्र.क्र.५१/नवि-७**

**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड**

**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**

**दिनांक : १० मार्च, २०२२.**

**पहा :-**

१. शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्र.नासुप्र-३३१३/प्र.क्र.४१/नवि-७, दिनांक ३० जानेवारी,२०१४.
२. शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्र. एमआरडी-३३१७/प्र.क्र.१८(महा-मेट्रो)/नवि-७ दिनांक ३१ मार्च,२०१७
३. शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्र. एमआरडी-३३१७/प्र.क्र.१०५/नवि-७ दिनांक २८ मार्च,२०१८
४. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक एमआरडी-३३१८/प्र.क्र.११५(३)/नवि-७ दि.०१ जानेवारी, २०१९.
५. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक एमआरडी-३३१८/प्र.क्र.११५(७)/नवि-७ दि. २२ मार्च, २०१९.
६. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक एमआरडी-३३१९/प्र.क्र.७०/नवि-७ दि.१९ मार्च, २०२०.
७. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक एमआरडी-३३२१/प्र.क्र.०२/नवि-७ दि. १० फेब्रुवारी, २०२१.
८. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३ दि. २४ जून, २०२१.
९. नगर विकास विभाग शासन निर्णय क्रमांकः एमआरडी-३३२१/प्र.क्र.५१/नवि-७, दिनांक : २९ डिसेंबर, २०२१.

**प्रस्तावना:**

नागपूर रेल्वे प्रकल्पास राज्यशासनाने नगर विकास विभाग शासन निर्णय, क्र.नासुप्र-३३१३/प्र.क्र.४१/नवि-७, दिनांक ३० जानेवारी, २०१४ अन्वये मान्यता दिली आहे. सदर प्रकल्पास केंद्रशासनाने क्रमांक K-१४०११/१(N-१)/२०१४-MRTS-III, दिनांक २१ ऑगस्ट, २०१४ रोजीच्या पत्रान्वये मान्यता दिली आहे. नागपूर मेट्रो रेल्वे प्रकल्पाची अंमलबजावणी करण्यासाठी नागपूर मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. या विशेष हेतू वहन कंपनीची स्थापन करण्यात आली होती. नागपूर मेट्रो रेल्वे कॉर्पोरेशन लि. चे जानेवारी, २०१७ मध्ये महाराष्ट्र मेट्रो रेल्वे कॉर्पोरेशन लि. मध्ये परिवर्तन झाले आहे. सदर विशेष हेतू वहन कंपनीमध्ये केद्र व राज्यशासनाचा ५०:५० असा सहभाग आहे. नागपूर मेट्रो रेल्वे प्रकल्पातील केंद्र व राज्य शासनाचा सहभाग हा गुंतवणूक/समभाग (Equity) व दुय्यम कर्ज सहाय्य या स्वरुपात रहाणार आहे. तसेच या प्रकल्पात नागपूर सुधार प्रन्यास व नागपूर महानगरपालिका यांचे अनुदान देखिल उपलब्ध होणार आहे. सदर प्रकल्पासाठी वित्तीय संस्थांचे कर्ज सहाय्य घ्यावयाचे असून हे कर्ज सहाय्य केंद्र शासनामार्फत घेतले जाणार आहे. अशा प्रकारच्या सर्व निधी हा सदर प्रकल्पाच्या अंमलबजावणी करणाऱ्या महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. या विशेष हेतू वहन कंपनीकडे सुपूर्द करावयाचा आहे. कर्जाची परतफेड या विशेष हेतू वहन कंपनीने करावयाची आहे.

२. नागपूर मेट्रो रेल्वे प्रकल्पास राज्य शासनाकडून २०% आर्थिक सहाय्यास दि. ३० जानेवारी २०१४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. तद्नंतर केंद्रशासनाने सदर प्रकल्पास दि. २१.८.२०१४ च्या पत्रान्वये मंजूरी दिली असून त्यानुसार नागपूर मेट्रो रेल्वे प्रकल्पाच्या प्रकल्प पूर्णत्वासाठी लागणारा एकूण रु ८६८० कोटी निधी मध्ये राज्यशासनाच्यावतीने समभाग म्हणून एकूण रु.१११४ कोटी व केंद्रीय कराच्या ५०% रक्कम रु.४४१ कोटी आणि राज्यस्तरीय करांसाठी रु.१८१ कोटी मिळून एकूण रु.६२२ कोटी दुय्यम कर्ज सहाय्य म्हणून उपलब्ध करावयाचे आहे.

३. नागपूर मेट्रो रेल्वे प्रकल्पाकरिता सन २०१६-१७ मध्ये रु.२६.२१ कोटी, सन २०१७-१८ मध्ये रु.६० कोटी, सन २०१८-१९ मध्ये रु.११० कोटी, सन २०१९-२० मध्ये रु.२०० कोटी, सन २०२०-२१ मध्ये रु. १५०.५९२५ व सन २०२१-२२ मध्ये रु.१२.५० कोटी असे एकूण रु.५५९.३०२५ कोटी इतकी रक्कम महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. या कंपनीस राज्य शासनाकडून तूर्त स्वरुपात बिनव्याजी दुय्यम कर्ज म्हणून वितरीत करण्यात आले आहे. आता, सन २०२१-२२ या वर्षामध्ये सदर प्रयोजनासाठी रु.२५ कोटी रुपये तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे. उक्त तरतूदीमधून **रु.१२.५० कोटी** इतकी रक्कम महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. या कंपनीस राज्य शासनाकडून तूर्त स्वरुपात बिनव्याजी दुय्यम कर्ज म्हणून वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> -**

१. नागपूर मेट्रो रेल्वे प्रकल्प कार्यान्वित करण्यासाठी राज्य शासनाकडून दुय्यम कर्ज म्हणून **रु.१२,५०,००,०००/- (अक्षरी रुपये बारा कोटी पन्नास लाख फक्त)** इतकी रक्कम महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. यांना प्रदान करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त रक्कम "मागणी क्र. एफ-७ ६२१७- नगर विकासासाठी कर्जे , ८०, सर्वसाधारण १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे राज्य योजना, (००) (०२) नागपूर मेट्रो रेल्वे प्रकल्पाकरिता राज्य शासनाचे दुय्यम कर्ज ५५ - कर्जे व आगाऊ रक्कमा सांकेतांक क्रमांक (६२१७०७८८) या लेखाशिर्षाखाली **सन २०२१-२२** मधील मंजूर तरतूदीतून खर्ची घालण्यात यावी.

३. उपरोक्त लेखाशीर्ष उपयोगात आणण्यासाठी नगर विकास विभागाचे कक्ष अधिकारी, नवि-५, यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच उपसचिव न.वि.-५, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. शासन निर्णयातील परिच्छेद -१ मध्ये नमूद करण्यात आलेली रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडून काढून ती महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. यास देण्यासाठी त्यांना अधिकार प्रदान करण्यात येत आहेत. नगर विकास विभागाच्या रोख शाखेने देयक तयार करुन ते अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे पाठवावे. याबाबतच्या खर्चमेळाची कार्यवाही नवि- ३१ कार्यासनाने करावी.

४. राज्यशासनाकडून दुय्यम कर्जसहाय्य म्हणून वितरीत केलेल्या उपरोक्त **रु.१२.५० कोटी** चा विनियोग नागपूर मेट्रो रेल्वे प्रकल्पासाठी महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेडला केंद्रीय/राज्यस्तरीय करापोटी येणाऱ्या खर्चासाठी करावयाचा आहे.

५. राज्यशासनाकडून दुय्यम कर्जसहाय्य म्हणून वितरीत उपरोक्त रक्कम **रु.१२.५० कोटी** महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेडकडून सदर प्रकल्पासाठी बाह्य वित्तीय संस्थाकडून घेतलेल्या मुख्य कर्जाची परतफेड केल्यानंतर वसूल करावयाची आहे.

६. सदर कर्ज सहाय्याची रक्कम सदर प्रकल्पाचे मुख्य कर्जाची परफेड केल्यानंतर एका हप्त्यात करण्यात यावी.

७. सदर दुय्यम कर्जावरील व्याजाबाबत वित्त विभागाकडे स्वतंत्र प्रस्ताव सादर करुन निर्णय घेण्यात येईल. भविष्यात या कर्जावर व्याज अदा करावयाचे झाल्यास त्याची वसूली महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. यांच्याकडून करण्यात येईल, या अटीवर महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. यांना वितरीत करावयाचे दुय्यम कर्ज **रु. १२.५० कोटी** हे तुर्त बिनव्याजी कर्ज म्हणून वितरीत करण्यात येत आहे.

८. नागपूर मेट्रो रेल्वे या प्रकल्पाकरिता राज्यशासनाकडून केंद्रीय व राज्यस्तरीय करापोटी येणाऱ्या खर्चासाठी प्राप्त झालेली रक्कम महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेडकडे जमा झाल्याचे प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

९. सदर रक्कम वितरीत झाल्यानंतर या रक्कमेतून खर्च केलेल्या रक्कमांचा तपशिल नागपूर सुधार प्रन्यास/राज्य शासन /केंद्रशासन यांना सादर करण्यात यावा.

१०. सदर प्रकल्पासाठी केंद्रशासन/राज्यशासन/नागपूर सुधार प्रन्यास/नागपूर महानगरपालिका इ. कडून तसेच राज्यशासनामार्फत केंद्रीय/करापोटी येणाऱ्या खर्चासाठी प्राप्त होणाऱ्या रक्कमांसाठी महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेड यांनी स्वतंत्र लेखे ठेवावेत.

११. राज्यशासनाकडून दिल्या जाणाऱ्या सदर कर्जसहाय्यासाठी राज्यशासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या कर्जा विषयीच्या इतर संबंधीत अटी व शर्ती लागू राहतील.

१२. नागपूर मेट्रो प्रकल्पासाठी प्राप्त होणाऱ्या निधीबाबत राज्य शासनाच्यावतीने सभापती, नागपूर सुधार प्रन्यास नागपूर यांनी स्वतंत्र लेखे ठेवावेत व वितरीत झालेल्या निधीचे संनियंत्रण करावे.

१३. सदर रक्कम ज्या प्रयोजनासाठी मंजूर केली आहे ती त्याच प्रयोजनासाठी खर्च केल्याचे उपयोगिता प्रमाणपत्र व्यवस्थापकीय संचालक महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन यांनी सभापती नागपूर सुधार प्रन्यास यांचे मार्फत सादर करावे.

१४. सदर कर्ज सहाय्याच्या वितरणाबाबत शादिक-२०१२/प्र.क्र.४९/ऋण व हमी दिनांक ३०/१२/२०१४ मधील सूचनानुसार महाऋण आज्ञावलीत **जोडपत्र-अ** (सोबत जोडले आहे) नुसार माहिती भरण्याची कार्यवाही करण्यात यावी.

१५. राज्य शासनाकडून नागपूर मेट्रो रेल्वे प्रकल्पाकरीता आतापर्यंत रु.५५९.३०२५ कोटी इतका निधी दुय्यम कर्ज सहाय्य म्हणून वितरीत करण्यात आला आहे. सदर आदेशान्वये वितरीत होणाऱ्या निधीनंतर एकूण वितरीत निधीची परिस्थिती खालील प्रमाणे :-

| **अनु.क्र.** | **दिनांक** | **रक्कम (रु. कोटी)** | **निधी वितरीत करणाऱ्या संस्थेचे नाव** | **एकूण वितरीत निधी (रु. कोटी)** |
|---|---|---|---|---|
| १ | ३१.०३.२०१७ | २६.२१ | राज्य शासन | २६.२१ |
| २ | २८.०३.२०१८ | ६०.०० | राज्य शासन | ८६.२१ |
| ३ | ०१.०१.२०१९ | ७७.०० | राज्य शासन | १६३.२१ |
| ४ | २२.०३.२०१९ | ३३.०० | राज्य शासन | १९६.२१ |
| ५ | १९.०३.२०२० | २००.०० | राज्य शासन | ३९६.२१ |
| ६ | १०.०२.२०२१ | १५०.५९२५ | राज्य शासन | ५४६.८०२५ |
| ७ | २६.१२.२०२१ | १२.५० | राज्य शासन | ५५९.३०२५ |
| ८ | सदरचे वितरण | १२.५० | राज्य शासन | ५७१.८०२५ |

१६. सदर निधी वितरण आदेश वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३ दि.१६ एप्रिल, २०२० मधील संबंधित सर्व अटींचे तसेच परिपत्रकासोबतच्या परिशिष्ठामधील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची पूर्तता होत आहे.

१७. सदर निधी वितरण आदेश नियोजन विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.१५९/११४४, दिनांक ०४.०२.२०२२ व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.४०/व्यय-३ दिनांक २५.०२.२०२२ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या सांकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०३१०१०१२१३८९२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vijay Karbhari Chaudhari

Digitally signed by Vijay Karbhari Chaudhari
DN: CN = Vijay Karbhari Chaudhari, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2022.03.10 13:29:24 +05'30'

**[विजय चौधरी]**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री, नगर विकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री, नगर विकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव, शहरी विकास मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
७. सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर.
८. आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर.
९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. नागपूर.
१०. महालेखापाल- (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
११. निवासी अधिदान व लेखा अधिकारी, (लेखा परीक्षा), मुंबई.
१२. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई ३२ .
१३. अधिदान व लेखाधिकारी मुंबई
१४. वित्त विभाग (व्यय-३), अर्थसंकल्प-१६, अर्थसंकल्प-३.
१५. नियोजन विभाग (कार्यासन १४४४)
१६. उपसचिव न.वि.-५, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. कक्ष अधिकारी नवि-४, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. कक्ष अधिकारी, नवि-३१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. रोख शाखा (५ प्रती)
२०. निवड नस्ती, नवि-७.

**शासन निर्णय क्रमांक: एमआरडी-३३२१/प्र.क्र.५१/नवि-७ दि. १० मार्च, २०२२ चे सहपत्र**

**जोडपत्र-अ**

**महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. यांना नागपूर मेट्रो प्रकल्पाकरीता सन २०२१-२२ मध्ये रु.१२.५० कोटीचे दुय्यम कर्ज सहाय्य वितरीत करण्याबाबत.**

| अ.क्र. | विवरण | माहिती |
|---|---|---|
| १. | संस्थेचे नांव | महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि., नागपूर (केंद्र व राज्यशासनाचे संयुक्त एसपीव्ही) मेट्रो हाऊस, २८/२, सी.के.मार्ग, आनंद मार्ग, सिव्हिल लाईन्स, नागपूर-४४० ००१. |
| २. | वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक व दिनांक | अनौपचारिक संदर्भ क्र.क्र.४०/व्यय-३ दिनांक २५.०२.२०२२. |
| ३. | कर्जाची एकूण मंजूर रक्कम | रु.६२२ कोटी |
| ४. | मंजूर कर्जापैकी यापूर्वी कर्जाची रक्कम वितरीत करण्यात आली असल्यास वितरीत करण्यात आलेली कर्जाची रक्कम | सन २०१६-१७ रु.२६.२१ कोटी<br>सन २०१७-१८ रु.६० कोटी<br>सन २०१८-१९ रु. ११० कोटी<br>सन २०१९-२० रु. २०० कोटी<br>सन २०२०-२१ रु. १५०.५९२५ कोटी<br>सन २०२१-२२ रु.१२.५० कोटी |
| ५. | मंजूर कर्जापैकी सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेली कर्जाची रक्कम | **रु.१२.५० कोटी** |
| ६. | एकापेक्षा अनेक सहकारी संस्था, व्यक्ती/यांना कर्ज मंजूर करण्यात आले असल्यास त्यांच्या नावासमोर, कर्ज मंजूरी रक्कम नमूद करण्यात यावी | लागू नाही. |
| ७. | एकूण कर्ज परतफेडीचे हप्ते | एका हप्त्यात |
| ८. | कर्ज परतफेडीचे हप्त्याची रक्कम | **रु.१२.५० कोटी** |
| ९. | कर्ज परतफेडीचे हप्त्याच्या कालावधी, जसे वार्षिक/सहामाही/त्रैमासिक इत्यादी | मुख्य कर्जाची परतफेड सन २०३६ मध्ये झाल्यावर दुय्यम कर्ज सहाय्याची परतफेड सन २०३७ मध्ये सुरू होईल. एका हप्त्यात वसूली होणे अपेक्षित आहे. |
| १०. | कर्ज परतफेडीसाठी सवलतीचा कालावधी (Moratorium Period) | नाही. |
| ११. | कर्ज परतफेडीसाठी हप्त्याच्या निश्चित केलेला कर्ज हप्त्याचा दिनांक | सन २०४० |

Vijay Karbhari Chaudhari

Digitally signed by Vijay Karbhari Chaudhari
DN: CN = Vijay Karbhari Chaudhari, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2022.03.10 13:29:41 +05'30'

**[विजय चौधरी]**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

| | | |
|---|---|---|
| १२. | कर्ज परतफेडीच्या पहिल्या हप्त्याचा दिनांक | सन २०४० |
| १३. | कर्ज परतफेडीच्या शेवटच्या हप्त्याचा दिनांक | सन २०४० |
| १४. | व्याज दर | सदर कर्जावर व्याज आकारणी बाबत तुर्तास तरतूद नाही. तथापि, भविष्यात व्याज आकारण्याची वेळ आल्यास वित्त विभागाच्या सहमतीने व्याज वसूली व व्याजाचा दर निश्चित करण्यात येईल. |
| १५. | विलंब कालावधीसाठी दंडनीय व्याजदर व इतर आकार | लागू नाही. |
| १६. | व्याजाचा परतफेडीच्या हप्त्याचा कालावधी जसे वार्षिक/त्रैमासिक/सहामाही इत्यादी | अनुक्रमांक १४ प्रमाणे |
| १७. | कर्जाच्या खर्चाकरीता लेखाशिर्ष | “मागणी क्र. एफ-७ ६२१७- नगर विकासासाठी कर्जे , ८०, सर्वसाधारण १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे राज्य योजना, (००) (०२) नागपूर मेट्रो रेल्वे प्रकल्पाकरिता राज्य शासनाचे दुय्यम  कर्ज ५५ - कर्जे व आगाऊ रक्कमा  सांकेतांक क्रमांक (६२१७०७८८) |
| १८. | कर्जाच्या वसूलीचे लेखाशिर्ष | नवीन लेखाशिर्ष घेण्यात येत आहे. |
| १९. | कर्जावरील व्याज/दंडनिय व्याज वसूलीचे लेखाशिर्ष | अनुक्रमांक १४ प्रमाणे |
| २०. | कर्जाशी संबंधित असलेल्या सहकारी संस्था यांचे पदनाम, पत्ता व दूरध्वनी क्रमांक | लागू नाही. |
| २१. | शासकिय कंपनीच्या नोडल ऑफीसचे पदनाम, पत्ता व दूरध्वनी क्रमांक | उप व्यवस्थापक (वित्त), महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि.,मेट्रो हाऊस, २८/२, सी.के.मार्ग, आनंद मार्ग, सिव्हिल लाईन्स, नागपूर-४४० ००१.<br>फोन नं. ०७१२-२५५४२१७<br>Email nmrcl.cafo@gmail.com |
| २२. | डी. डी.ओ.चा नंबर | कक्ष अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.<br>डी. डी.ओ. नंबर- ७१०१००२३०१ |

Vijay Karbhari Chaudhari

Digitally signed by Vijay Karbhari Chaudhari
DN: CN = Vijay Karbhari Chaudhari, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2022.03.10 13:29:53 +05'30'

**[विजय चौधरी]**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

****